**विक्रीकर कर्मचारी कल्याण निधीच्या**
**नियम १० मध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र : विकआ-१२१५/प्र.क्र.२४/वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ५ मे, २०१५.

**संदर्भ :-** शासन निर्णय क्र. एसटीडी-१४८०/४९०/८०/एडीएम-८, दिनांक १९ सप्टेंबर, १९८४

प्रस्तावना :-

विक्रीकर विभागात काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या कल्याणासाठी १९७२ मध्ये विक्रीकर कर्मचारी कल्याण निधीची स्थापना केलेली आहे. शासन निर्णय, क्र.एसटीडी-४८०/४९०/ ८०/ एडीएम-८, दि.१९.९.१९८४ च्या निर्णयान्वये शासनाने सदर समितीची कार्ये, उद्दिष्ट, रचना याबाबत नियम निश्चित केलेले आहेत. सदर नियमावलीतील नियम १० मध्ये मुंबई, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद आणि नागपूर विभागांसाठी प्रादेशिक समित्या स्थापन करण्यासाठीची तरतूद आहे. मुंबई येथील प्रादेशिक समितीमध्ये मुंबईबरोबरच कोकण भवन, वाशी, नवी मुंबई या ठिकाणी कार्यरत विभागाचाही समावेश करण्यात आलेला आहे. तथापि, मुंबई सभोवतालच्या परिसरात कोकण भवन, ठाणे व पालघर येथे विभागीय कार्यालय आहेत. तसेच, विक्रीकर विभागाच्या दि.०५.०१.२००७ च्या आकृतीबंधानुसार उपरोक्त विभागांव्यतिरिक्त ठाणे, ठाणे ग्रामीण, रायगड, अमरावती, धुळे, नांदेड व सोलापूर हे विभाग नव्याने गठीत करण्यात आलेले आहेत. विक्रीकर कर्मचारी कल्याण निधी नियमाच्या नियम १० मध्ये सदर विभागांचा समावेश नाही. सदर ठिकाणी विक्रीकर कर्मचारी कल्याण निधीच्या प्रादेशिक समित्या स्थापन करण्यासाठी, सदर ठिकाणांचा विक्रीकर कर्मचारी कल्याण निधी नियमाच्या नियम १० मध्ये समावेश होणे गरजेचे आहे. त्यानुसार विक्रीकर कर्मचारी कल्याण निधी नियमाच्या नियम १० मध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

विक्रीकर विभागात काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या कल्याणासाठी १९७२ मध्ये विक्रीकर कर्मचारी कल्याण निधीची स्थापना केलेली आहे. शासन निर्णय, क्र.एसटीडी-४८०/४९०/ ८०/ एडीएम-८, दि.१९.९.१९८४ च्या निर्णयान्वये शासनाने सदर समितीची कार्ये, उद्दिष्ट, रचना याबाबत

नियम निश्चित केलेले आहेत. सदर नियमावलीतील नियम १० मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

"There shall be a separate Regional Committee for Mumbai, Thane, Pune, Kolhapur, Nashik, Aurangabad, Dhule, Solapur, Nanded and Amravati. The Regional Committee for Mumbai shall include all the divisions working at Mazgaon and Bandra office, whereas the Regional Committee for Thane shall include the divisions working at Thane, Konkan Bhavan and Palghar. The Regional Committee shall assist the Governing Body in the administration of the fund in the Division. "

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०५१७५१५१५१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashwant Dattatraya Deshkar

Digitally signed by Yashwant Dattatraya Deshkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashwant Dattatraya Deshkar
Date: 2015.05.05 17:53:30 +05'30'

( य. द. देशकर )
अवर सचिव, वित्त विभाग.

**प्रति,**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,माझगाव, मुंबई — १०,
२. विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, माझगाव, मुंबई - १०,
३. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १६-अ, मंत्रालय, मुंबई — ३२,
४. महाराष्ट्र विक्रीकर राजपत्रित अधिकारी संघटना, माझगाव, मुंबई — १०,
५. महाराष्ट्र विक्रीकर कर्मचारी संघटना, माझगाव, मुंबई — १०,
६. महाराष्ट्र विक्रीकर चतुर्थश्रेणी कर्मचारी संघटना, माझगाव, मुंबई — १०,
७. निवड नस्ती, विक्रीकर (प्रशा ४).